




**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५ वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-०२२-२२७९४२५७ Email ID : Desk14b.gad-mh@gov.in

**क्रमांक : कअनि-११२४/प्र.क्र.५२/प्रशा-२(१४ब)** **दिनांक:- ३१ जुलै, २०२४**

**प्रति,**
सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**विषय:- महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई या कार्यालयातील पदे प्रतिनियुक्तीने भरणेबाबत**

**संदर्भ:**-१)सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२,दिनांक १७.१२.२०१६
२)सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दिनांक १६.०२.२०१८
३)सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दिनांक ३१.०८.२०१७
४) शासन पत्र समक्रमांक दिनांक ०४.०७.२०२४

**महोदय/महोदया,**

उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील दिनांक ०४.०७.२०२४ अन्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई या कार्यालयातील पदे प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी व सहायक कक्ष अधिकारी या संवर्गातील अधिकाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात आली असून इच्छुक अधिकाऱ्यांचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव विहित विवरणपत्र व मागील ०५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायांकित प्रतीसह पर्यवेक्षीय विभागामार्फत दिनांक २५.०७.२०२४ पर्यत सादर करण्याबाबत कळविण्यात आले होते. (सदर जाहिरातीची प्रत सोबत जोडली आहे)

२. आता, सदर जाहिरातीस अनुसरुन मंत्रालयीन संवर्गातील इच्छुक कक्ष अधिकारी व सहायक कक्ष अधिकारी यांचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव पर्यवेक्षीय विभागामार्फत सादर करण्यास **दिनांक ०९.०८.२०२४ पर्यत** मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७३११२३९३४४७०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

VIVEK RAMAKANT JADHAV

Digitally signed by VIVEK RAMAKANT JADHAV
DN: CN = VIVEK RAMAKANT JADHAV, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2024.07.31 15:27:15 +05'30'

**सोबत:-वरीलप्रमाणे** **( वि.र.जाधव )**

**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अवर सचिव (पापु-२३), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

२) निवड नस्ती/प्रशा-२ (१४ब)






**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५ वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-०२२-२२७९४२५७ Email ID : Desk14b.gad-mh@gov.in

................................................................................................................................

क्रमांक : कअनि-११२४/प्र.क्र.५२/प्रशा-२(१४ब) दिनांक:- ०४ जुलै, २०२४

**प्रति,**

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**विषय:- महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई या कार्यालयातील पदे प्रतिनियुक्तीने भरणेबाबत.**

**संदर्भ:-**१) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२,दिनांक १७.१२.२०१६
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दिनांक १६.०२.२०१८
३) सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दिनांक ३१.०८.२०१७

**महोदय/महोदया,**

संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक १७.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक १६.०२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर धोरणामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक ३१.८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये, मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे.

२. उपरोक्त शासन निर्णयान्वये विहित कार्यपध्दतीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई या कार्यालयातील खालील नमूद पदे प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी व सहायक कक्ष अधिकारी या संवर्गातील अधिकाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे:-

| अ.क्र. | मंत्रालयीन विभागातील पदाचे नाव | प्रतिनियुक्तीने भरावयाचे पद | वेतनश्रेणी (७ व्या वेतन आयोगानुसार) | पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १. | कक्ष अधिकारी | कक्ष अधिकारी/विशेष अधीक्षक | एस-१५ (४१८००-१३२३००) | ०४ |
| २. | सहायक कक्ष अधिकारी | कार्यासन अधिकारी/ अधीक्षक | एस-१४ (३८६००-१२२८००) | ०५ |

३. उपरोक्त विवरणपत्रात नमूद पदे मंत्रालयीन संवर्गातील अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्याकरिता सदर जाहिरात प्रसिध्द करण्यात येत असल्याने, या जाहिरातीस अनुसरुन क्षेत्रिय कार्यालयातील अधिकाऱ्यांनी सदर पदांकरिता या विभागाकडे अर्ज सादर करु नयेत व असे अर्ज सादर करण्यात आल्यास ते विचारात घेतले जाणार नाहीत, तसेच त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

४. सदर पदासाठी प्रतिनियुक्तीवर जाण्यास इच्छुक असलेल्या मंत्रालयीन संवर्गातील अधिकाऱ्यांनी परस्पर या विभागाकडे अर्ज सादर करु नयेत. त्यांनी आपआपल्या विभागामार्फत अर्ज सादर करावेत. परस्पर अर्ज सादर केल्यास त्या अर्जांचा विचार करण्यात येणार नाही व त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

५. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक अधिकाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जाची छाननी करुन आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कक्ष अधिकारी/ सहायक कक्ष अधिकारी यांचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव सोबत जोडलेल्या प्रपत्रातील माहिती व मागील पाच वर्षांच्या परिपूर्ण गोपनीय अहवालांच्या छायांकित प्रतीसह या कार्यासनाकडे **दिनांक २५.०७.२०२४** पर्यंत पोहोचतील अशा रीतीने पाठवावा. (नोंदणी शाखेत पाठवू नये)

६. एकदा निवड झालेल्या अधिकाऱ्यांस त्याचे नांव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया **दिनांक २५.०७.२०२४** पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.

७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सदरचे पत्र त्यांच्या विभागातील सर्व कक्ष अधिकारी व सहायक कक्ष अधिकारी यांच्या निदर्शनास आणावे.

सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७०४१७२५२७६१०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

VIVEK RAMAKANT JADHAV

Digitally signed by VIVEK RAMAKANT JADHAV
DN: CN = VIVEK RAMAKANT JADHAV, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2024.07.31 15:27:45 +05'30'

**( वि. र. जाधव )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अवर सचिव (पापु-२३), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२) निवड नस्ती/प्रशा-२(१४ब)

**महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई या कार्यालयातील पदे प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.**

## प्रतिनियुक्तीबाबतचे विहित प्रपत्र

<table>
<tr><td>१)</td><td>अधिकारी/कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम</td><td></td></tr>
<tr><td>२)</td><td>सध्या वेतन घेत असलेली वेतनश्रेणी</td><td></td></tr>
<tr><td>३)</td><td>जन्मदिनांक</td><td></td></tr>
<tr><td>४)</td><td>प्रथम नियुक्तीचा दिनांक</td><td></td></tr>
<tr><td>५)</td><td>कक्ष अधिकारी/सहायक कक्ष अधिकारी पदावरील नियुक्तीचा दिनांक</td><td></td></tr>
<tr><td>६)</td><td>सेवानिवृत्तीचा दिनांक<br>[पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६)]</td><td></td></tr>
<tr><td>७)</td><td>शैक्षणिक अर्हता</td><td></td></tr>
<tr><td>८)</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>९)</td><td>मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत)</td><td></td></tr>
<tr><td>१०)</td><td>मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०२४ रोजीचे)</td><td></td></tr>
<tr><td>११)</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>१२)</td><td>संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (कालावधी, पद व ठिकाण)
<table>
<tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td>पद</td><td>प्रतिनियुक्तीचे ठिकाण (कार्यालय)</td></tr>
<tr><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td></tr>
</table>
</td><td>प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी<br>------- वर्षे</td></tr>
<tr><td>१३)</td><td>संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय?</td><td></td></tr>
<tr><td>१४)</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>१५)</td><td>प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे?</td><td></td></tr>
</table>

**(आस्थापना अधिकाऱ्याचे नांव, पदनाम व स्वाक्षरी)**